**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) शिवाजी दासराव माडजे, सहशिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.९७/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०४ मार्च, २०२४.

संदर्भ :-

(१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.

(२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/ टीएनटी-६,दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र

(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद लातूर यांचे दि. जून,२०२२ चे शिफारस पत्र

(४) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/८०२/संकीर्ण/७९०२/२०२३, दि. ०२/११/२०२३

(५) शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे पत्र क्र. शिउसला/कार्या-११/आरबीडी/२०२३-२०२४/१२०२, दि.१४/०२/२०२४

ज्ञापन :-

कै. (श्री.) शिवाजी दासराव माडजे, सहशिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, कव्हा, जि. लातूर यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २५/०४/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार कै. (श्री.) शिवाजी दासराव माडजे यांच्या वारसास रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील दि.०२/११/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद लातूर यांनी संदर्भ क्र. (३) येथील दि.जून, २०२२ रोजीच्या पत्रान्वये कै.(श्री.) माडजे यांच्या परिवारास रु.५० लाख विमा कवच सानुग्रह अनुदान सहाय्य मिळण्याकरिता शिफारस केली आहे.

३.	कै. (श्री.) शिवाजी दासराव माडजे यांची गट विकास अधिकारी वर्ग-१, पंचायत समिती लातूर यांच्या दि.३१.०३.२०२१ रोजीच्या आदेशान्वये कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव व प्रसार टाळण्याच्या दृष्टीने संस्थात्मक विलगीकरण केलेल्या व्यक्तींच्या ठिकाणी/शाळेत/ग्रामदक्षता/ प्रभाग समिती ठरवेल त्या वेळेनुसार कामकाज पाहणे व नियमित कामकाजाचा दैंनंदिन अहवाल त्या कार्यालयास सादर करण्याकरिता प्राथमिक आरोग्य उपकेंद्र कव्हा या ठिकाणी नियुक्ती करण्यात आली. कै. (श्री.) माडजे हे हॉस्पिटलमध्ये दाखल होण्याच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्यावर हजर राहून कामकाज केल्याबाबतचे प्रमाणपत्र गट शिक्षणाधिकारी,पंचायत समिती, लातूर यांनी दि.३१/०५/२०२२ अन्वये प्रमाणित केले आहे

४.	कै. (श्री) माडजे यांची दि. ११/०४/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आल्याने त्यांना दि.११/०४/२०२१ रोजी पद्मिनी स्पेशालिटी क्लिनीक, लातूर या ठिकाणी दाखल करण्यात आले. कै.(श्री) माडजे यांचेवर दि.११/०४/२०२१ ते २२/४/२०२१ या कालावधीत पद्मिनी स्पेशालिटी क्लिनीक, लातूर या ठिकाणी कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. तद्नंतर दि.२४/०४/२०२१ रोजी त्यांना ग्रामीण हॉस्पिटल किल्लर, ता.औसा, जि.लातूर येथे दाखल करण्यात आले. उपचारा दरम्यान दि.२५/०४/२०२१ रोजी त्यांचा मृत्यु झाला. याबाबतचे वैद्यकीय प्रमाणपत्र (फॉर्म क्र.४) द्वारे वैद्यकिय अधिकारी, ग्रामीण हॉस्पिटल किल्लर, ता.औसा, जि.लातूर यांनी प्रमाणित केले आहे.

५.	रजिस्ट्रार, (जन्म-मृत्यू), आरोग्य विभाग, ग्राम पंचायत तांबरवाडी , यांनी त्यांच्या दि.३०/०४/२०२१ रोजीच्या प्रमाणपत्रान्वये कै. (श्री.) माडजे यांचा दि.२५/०४/२०२१ रोजी मृत्यू झाल्याबाबतचे मृत्यू प्रमाणपत्र दिलेले आहे.

६.	मा. सह दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर, लातूर यांनी कै. (श्री.) माडजे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती मीरा शिवाजीराव माडजे (पत्नी), (२) श्री.ज्ञानेश्वर शिवाजीराव माडजे (मुलगा), व (३) श्री.राजेश्वर शिवाजीराव माडजे (मुलगा) यांना घोषित केले आहे.

७.	शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, लातूर व गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, लातूर तसेच, वैद्यकिय अधिकारी, ग्रामीण हॉस्पिटल किल्लर, ता.औसा, जि.लातूर यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कागदपत्रांची पडताळणी करून संदर्भ क्र. ४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार कै. (श्री.) माडजे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती मीरा शिवाजीराव माडजे (पत्नी), (२) श्री.ज्ञानेश्वर शिवाजीराव माडजे (मुलगा), व

(३) श्री.राजेश्वर शिवाजीराव माडजे (मुलगा) यांना घोषित केल्यानुसार एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/२०२२/व्यय-९, दिनांक ०५/१२/२०२२ अन्वये खालील नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल. सदरचा खर्च आर्थिक वर्षे २०२४-२०२५ करिता उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

९. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३०४१७५६३६७३२१ असा आहे. सदर शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.04 18:05:46 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), लातूर

प्रत माहितीसाठी:-

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती मिरा शिवाजी माडजे, रा.सर्व कातपुर रोड, नरहरी सोनार मंदीर जवळ, शंकर पुरम नगर, ता.जि.लातूर
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ९७/२०२३)